पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अखत्यारीतील जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रमांतर्गत असलेल्या विशेष सनियंत्रण कक्षातील उपसंचालक पदावरील प्रतिनियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आपना-२०१६/प्र.क्र.४८१/पापु-१५**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३० डिसेंबर, २०१६.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** जस्वप्र-०११४/प्र.क्र.०६/पापु-११, दिनांक ०७/०२/२०१४.
२) **शासन निर्णय क्रमांकः** जस्वप्र-०११४/प्र.क्र.२८/पापु-११, दिनांक १०/०२/२०१४.
३) **शासन आदेश क्रमांकः** आपना-२०१४/प्र.क्र.१५७/पापु-१५, दिनांक १९/०८/२०१४.
४) **श्री.शशांक देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांची स्वेच्छासेवानिवृत्तीची सूचना दिनांकः** २८/१०/२०१६.

**प्रस्तावना :-**

श्री.शशांक मनोहर देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांची संदर्भाधीन क्रमांक ३ येथील आदेशान्वये जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत असलेल्या विशेष सनियंत्रण कक्षात उपसंचालक या पदावर तीन वर्षाच्या कालावधीसाठी किंवा जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमाच्या कालावधीपुरती, यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपुरती प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती.

श्री.शशांक मनोहर देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये स्वेच्छासेवानिवृत्तीची सूचना शासनास सादर केली असून या सूचनेचा कालावधी दिनांक २७/०१/२०१७ रोजी संपुष्टात येत आहे.

श्री.शशांक मनोहर देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनास सादर केलेली स्वेच्छासेवानिवृत्तीची सूचना विचारात घेऊन, संदर्भाधीन क्रमांक ३ येथील आदेशान्वये जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत असलेल्या विशेष सनियंत्रण कक्षात उपसंचालक या पदावर तीन वर्षाच्या कालावधीसाठी किंवा जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमाच्या कालावधीपुरती,

यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपुरती श्री. देशपांडे यांची प्रतिनियुक्तीने केलेली नियुक्ती संपुष्टात आणून त्यांना नियमित पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन, श्री.शशांक मनोहर देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांची जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत असलेल्या विशेष सनियंत्रण कक्षातील "उपसंचालक" या पदावरील प्रतिनियुक्ती दिनांक ३१/१२/२०१६ (मध्यान्ह नंतर) पासून संपुष्टात आणण्यात येत असून दिनांक ०१/०१/२०१७ पासून संचालनालयातील रिक्त असलेल्या वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या मूळ पदावर त्यांची नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत असलेल्या विशेष सनियंत्रण कक्षात उपसंचालक या पदावरील प्रतिनियुक्ती करीता यापूर्वी अस्तित्वात असलेली निवड प्रक्रिया कायम आहे. या निवड प्रक्रियेनुसार उपसंचालक, जलस्वराज्य टप्पा-२ पदावरील प्रतिनियुक्तीसाठी निवड करण्याची कार्यवाही पापु-११ कार्यासनामार्फत स्वतंत्रपणे करण्यात यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201612301427390528 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d8086 3da34d0a26661f5eefb602c359549d8e d4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2016.12.30 14:44:14 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सु.स.प्र.व्य.कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
५. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. सहाय्यक संचालक, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
८. श्री.शशांक मनोहर देशपांडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. (संचालनालयामार्फत)
९. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)